**मा.सर्वोच्च न्यायालयाचे रॅगिंग प्रतिबंध करण्यासंदर्भात दिलेल्या निर्णयाची अमंलबजावणी करण्याबाबत**

**महाराष्ट्र शासन**

**उच्च व तंत्र शिक्षण विभाग**

**शासन परिपत्रक क्र. याचिका २०१०प्र/.क्र.३२८/विशि-३**

मंत्रालय विस्तार, मुंबई- ४०००३२.

दिनांक: ०४ जून, २०१५.

<u>वाचा:-</u> १.केरळ विद्यापीठ विरूध्द कौन्सिल,प्रिन्सिपॉल्स,कॉलेजेस,केरळा ॲन्ड इतर या स्पेशल लिव्ह अपिल (Civil) क्रमांक २४२९५/२००४ मध्ये मा.सर्वोच्च न्यालयाने दिलेले दिनांक १६ मे २००७ चे अंतरिम आदेश

२.रॅगिंग प्रतिबंध संदर्भात मा.सर्वोच्च न्यायालयाने दि.१८ मे २००७ रोजी दिलेले निर्देश

३.शासन परिपत्रक क्रं. संकिर्ण -२००५/(२३८/०५)/विशि-१, दि.१८.०७.२००७

४.मा.सर्वोच्च न्यायालयाचे सी.ए.क्रंमांक ८८७/२००९ मधील आदेश दि.२२.०६.२००९

५.मा.उच्च न्यायालय, मुंबई यांचे जनहित याचिका क्रं.१७२/२०१० मधील आदेश दि.२७.०२.२०१५

**परिपत्रक-:**

शालेय स्तरावरून महाविद्यालयात प्रवेश घेणा-या नवीन विद्यार्थ्याचे , विशेषत: अन्य गावातून आलेल्या विद्यार्थ्याचे त्यांचेपेक्षा वरील वर्गातील विद्यार्थ्याकडून होत असलेल्या रॅगिंगमुळे मानसिक स्वास्थ खराब होण्याच्या वारंवार घटना घडतात. अशा घटनांमुळे विद्यार्थ्याचे शैक्षणिक नुकसान तर होतेच परंतु आत्महत्येसारख्या घटनाही घडू शकतात.

वरील बाबींचा सर्वकष विचार करून मा.सर्वोच्च न्यायालयाने संदर्भ क्रं.२ अन्वये दिलेल्या सूचनांची कडक अमंलबजावणी करण्याबाबत शासन परिपत्रक क्रं. संकिर्ण -२००५/(२३८/०५)/विशि-१, दि.१८.०७.२००७ अन्वये सर्व संबंधित विभाग, संचालक, सहसंचालक, सर्व विद्यापीठाचे कुलगुरू,कुलसचिव,शालेय शिक्षण विभाग,वैद्यकीय शिक्षण विभाग,कृषी शिक्षण विभाग यांना सूचना देण्यात आल्या होत्या.

या परिपत्रकाव्दारे सर्व संबंधितांना कळविण्यात येते की, रॅगिंग प्रतिबंधाची योग्य अमंलबजावणी होण्याच्या दृष्टीकोनातून खालील सूचनांची काटेकोरपणे अमंलबजावणी करावी.

१. रॅगिंग सारख्या गुन्ह्याची पुनरावृत्ती होऊ नये म्हणून देण्यात येणारी शिक्षा कडक असावी, जेणे करून इतरांना दहशत बसेल.

२. रॅगिंगच्या प्रत्येक घटनेमध्ये संस्था स्तरावर करण्यात आलेली कार्यवाई जर संबंधित विद्यार्थ्याला (Victim) किंवा संस्थेच्या प्रमुखाला समाधानकारक वाटत नसेल तर

कोणताही अपवाद न करता संस्थेच्या प्रधिका-यांनी स्थानिक पोलिसांकडे F.I.R. दाखल करावा.बळी पडलेल्या विद्यार्थ्याच्या पालकांना पोलिसांमध्ये परस्पर F.I.R. दाखल करावायाचा असला तरीही संस्थेच्या प्राधिका-यांनी F.I.R. दाखल करणे आवश्यक राहील.

३. शैक्षणिक संस्थेकडून प्रवेशासाठी छापलेल्या पुस्तिकेमध्ये (Prospectus) असे स्पष्टपणे नमूद करावे की, प्रवेशासाठी येणारा विद्यार्थी यापूर्वी रॅगिंग करण्यामध्ये गुंतलेला असेल तर त्याला प्रवेश नाकारण्यात येईल वा प्रवेश दिल्यानंतरही असे निदर्शनास आले की, सदर विद्यार्थी रॅगिंग करण्यामध्ये गुंतलेला होता तर त्याला निष्काशित करण्यात येईल.

४. संबंधित संस्थेचे प्रधिकारी आणि कार्यकर्ते यांची रॅगिंगला प्रतिबंध करण्याची सामुदायिक जबाबदारी राहील. शैक्षणिक संस्थेने रॅगिंगला प्रतिबंध करण्याची परिणामकारक उपाययोजना केली किंवा नाही याची शासनाला तपासणी करता येईल आणि जर यामध्ये त्यांना योग्य ती कार्यवाही केली नसेल तर शासनाकडून अनुदान नाकारण्यासारखी कारवाई केली जावू शकेल.

५. शैक्षणिक संस्थांनी रॅगिंगला प्रतिबंध समित्या आणि पथके तातडीने स्थापन करतील.मा.सर्वोच्च न्यायालयाने तातडीने अमंलबजावणी केली आहे की नाही, हे पाहण्याचे काम सदर समित्या आणि पथकाचे राहील. मा.सर्वोच्च न्यायालयाच्या निदेशाप्रमाणे शिफारशीची अमंलबजावणी होत नसेल तर समित्यांनी ही बाब मा.सर्वोच्च न्यायालयाच्या निर्दशनास आणण्यात यावी .

६. महाविद्यालय/ शैक्षणिक संस्थेत/वसतिगृह प्रवेश प्रक्रिया पूर्ण झाल्यानंतर प्राचार्य/गृहप्रमुख/संचालक हे नव्या व जुन्या विद्यार्थ्याची सभा घेऊन रॅगिंगला प्रतिबंधाबाबत दिशा निर्देश द्यावेत व कडक शिक्षेबाबत पुर्व कल्पना विद्यार्थ्यांना द्यावी.

७. वसतिगृहात नव्या व जुन्या विद्यार्थ्याची राहण्याची व्यवस्था वेगवेगळया इमारतीत असावी. तसे शक्य नसल्यास, वसतिगृह प्रमुखाने रॅगिंगला प्रतिबंधाबाबत विशेष दक्षता घ्यावी.

८. रॅगिंग तक्रार रजिस्टर प्रत्येक महाविद्यालय/ संस्था/वसतिगृहात ठेवण्यात यावे.

९. महाविद्यालय/ संस्था/वसतिगृहा मध्ये रॅगिंगला प्रतिबंधत्मक माहिती देणारा फलक असावा. ज्यामध्ये शिक्षेचे स्वरूप, होऊ शकणारी कडक कारवाई, अँटी रॅगिंग समितीच्या पदाधिका-यांची नावे भ्रमणध्वनी क्रमांक नमूद आसावा.

तरी सर्व संबंधिताना कळविण्यात येते की, मा.सर्वोच्च न्यायालयाने दिलेल्या आदेशांची तातडीने अमंलबजावणी करण्याच्या दृष्टीने सदर परिपत्रक व मा.सर्वोच्च न्यायालयाचा निर्णय महाविद्यालये, शैक्षणिक संस्था यांच्या निदर्शनास आणावे.

सदर शासन परिपत्रक महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०१५०६०५१११११५७७०८ असा आहे. हे परिपत्रक डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

Siddharth Rambhau Kharat

Digitally signed by Siddharth Rambhau Kharat
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=Deputy Secretary, postalCode=400032, st=Maharashtra, cn=Siddharth Rambhau Kharat
Date: 2015.06.08 14:49:16 +05'30'

**( सिध्दार्थ खरात )**

**उपसचिव, महाराष्ट्र शासन**

**प्रति,**

१. संचालक (उच्च शिक्षण) महाराष्ट्र राज्य पुणे.
२. सर्व विभागीय सहसंचालक(उच्च शिक्षण).
३. कुलसचिव, सर्व अकृषी विद्यापीठ.
४. गृहविभाग, मंत्रालय,मुंबई
५. शालेय शिक्षण विभाग, मंत्रालय,मुंबई
६. संचालक, (तंत्र शिक्षण) महाराष्ट्र राज्य,मुंबई
७. सर्व शासकीय तंत्र शिक्षण महाविद्यालये व संस्था संचालक,तंत्र शिक्षण महाराष्ट्र राज्य,मुंबई यांचे मार्फत)
८. सर्व विभागीय सहसंचालक तंत्र शिक्षण
९. वैद्यकीय शिक्षण विभाग, मंत्रालय,मुंबई
१०.संचालक, वैद्यकीय शिक्षण अणि संशोधन महाराष्ट्र राज्य,मुंबई-०९
११.कृषि व प.दु.म. विभाग, मंत्रालय,मुंबई
१२.निवड नस्ती (विशि-१)